**राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत ६०००० कडधान्य गावांचा एकात्मिक विकास कार्यक्रम सन २०११- १२ मध्ये राबविण्यासाठी वित्तीय मान्यता देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- कविका- १६११/ प्र.क्र. १६५/४अे**
**मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२**
**दिनांक - ३० ऑगस्ट, २०११**

**संदर्भ :-** १) केंद्र शासनाचे संकेत स्थळ "www.agricoop.nic.in " वर उपलब्ध असलेल्या सदर योजनेबाबतच्या मार्गदर्शक सूचना .
२) शासन निर्णय क्र. कविका- १६११/ प्र.क्र. १६५/४अे, दि. १५ जुलै, २०११
३) शासन निर्णय क्र. राकृवि-२०११/प्र.क्र. ६३/राकृवियो, दि. ३० जुलै, २०११

**प्रस्तावनाः-**

कडधान्य पिकांची उत्पादन व उत्पादकता वाढविण्यासाठी सन २०११-१२ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेतून ६०००० गावांमध्ये एकात्मिक कडधान्य विकास कार्यक्रम मंजूर करण्यात आला असून या योजने अंतर्गत मूलस्थानी जलसंधारण, किड रोग सर्वेक्षणासह गतिमान कडधान्य उत्पादन कार्यक्रम व कृषि उत्पन्नाचे विपणनासाठी विस्तार कार्यक्रमाचा सहभाग इ. घटकांचा प्रामुख्याने समावेश करण्यात आला आहे. मुल स्थानी जलसंधारण या कार्यक्रमांअंतर्गत नवीन शेततळ्यांचा पॉलीथिलीन अस्तरीकरणासह कार्यक्रम व जुन्या शेततळ्यांचा पॉलीथिलीन अस्तरीकरण कार्यक्रम यांचा समावेश आहे. किड रोग सर्वेक्षणासह गतिमान कडधान्य उत्पादन कार्यक्रमाची अमंलबजावणी ५०० हेक्टर क्षेत्राचा गट तयार करून योजनेतील प्रात्यक्षिके समूह पध्दतीने राबवयाची आहेत. पीकाचे क्षेत्रानुसार तसेच जेथे क्षेत्र वाढीस व उत्पादकता वाढीस वाव आहे याचा विचार करून गावांची निवड करावयाची आहे. गतवर्षी ज्या गावात गतिमान कडधान्य उत्पादन कार्यक्रम ( अे३पी) प्रात्यक्षिके घेण्यात आली ती गावे या योजनेमध्ये अंतर्भूत होणार नाहीत. सदर योजना राज्यात राबविण्यासाठी केंद्र शासनाने एकूण रू. ५०९६.०० लाख ( रू. पन्नास कोटी शहाण्णव लाख फक्त ) निधीचा कार्यक्रम मंजूर केला आहे. केंद्र शासनाने मजूर केलेल्या रू. ५०९६.०० लाख निधीच्या कार्यक्रमास अ.क्र. २ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर निधीपैकी राकृवियो कक्षाने त्यांच्या अ.क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये रू. २५४८.०० लाख ( रू. पंच्चवीस कोटी अठ्ठेचाळीस लाख फक्त ) निधी वितरित केला आहे. राकृवियो कक्षाने वितरित केलेल्या रू. २५४८.०० लाख निधीस वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कडधान्य पिकांची उत्पादन व उत्पादकता वाढविण्यासाठी सन २०११-१२ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेतून ६०००० गावांमध्ये एकात्मिक कडधान्य विकास कार्यक्रम मंजूर करण्यात आला असून केंद्र शासनाने **६०००० कडधान्य गावांचा एकात्मिक विकास कार्यक्रम** राज्यात सन २०११ - १२ मध्ये राबविण्यासाठी रू. ५०९६.०० लाख निधीच्या कार्यक्रमास मान्यता दिली आहे. सदर निधीपैकी राकृवियो कक्षाने रू. २५४८.०० लाख निधीस वितरित करण्यास दिलेली मान्यता विचारात घेऊन **६०००० कडधान्य गावांचा एकात्मिक विकास कार्यक्रम** राज्यात सन २०११ - १२ मध्ये राबविण्यासाठी रू. २५४८.०० लाख निधीच्या कार्यक्रमास शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजना राज्यात, केंद्र शासनाचे संकेत स्थळ **"www.agricoop.nic.in "** वर उपलब्ध असलेल्या सदर योजनेबाबतच्या मार्गदर्शक सुचनांनुसार तसेच दि. १५ जुलै, २०११ च्या शासन निर्णयामध्ये अंतर्भूत केलेल्या परिशिष्टातील नमूद बाबींनुसार राबविण्यात यावा.

३.	या कार्यक्रमासाठी मंजूर केलेला निधी खर्च करण्यास **संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे** यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे, तसेच मंजूर निधीचे जिल्हा निहाय वितरण करण्यास **संचालक (विस्तार व प्रशिक्षण),कृषि आयुक्तालय, पुणे** यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र (Utilisation Certificate)आयुक्त ( कृषि ) यांच्या स्वाक्षरीने राकृवियो कक्षास सादर करण्यात यावे.

४.	**६०००० कडधान्य गावांचा एकात्मिक विकास** कार्यक्रमाच्या उद्दिष्ट पूर्तीसाठी संचालक (विस्तार व प्रशिक्षण),कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी केंद्र शासनाचे संकेत स्थळ "www.agricoop.nic.in " वर उपलब्ध असलेल्या सदर योजनेबाबतच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेवून उद्दिष्ट निहाय सविस्तर मार्गदर्शक सूचना सर्व क्षेत्रीय अधिका-यांना निर्गमित कराव्यात. या मार्गदर्शक सूचना निर्गमित करतेवेळी दि. १५ जुलै, २०११अन्वये निर्गमित केलेल्या प्रशासकीय मान्यतेच्या शासन निर्णयातील परिच्छेद ३ मध्ये नमूद केलेल्या मुद्दा क्र. i) ते vi) मधील बाबींचा अंतर्भूत करावा.

५.	केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे या योजनेचा मासिक आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याला विहित मुदतीत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल याची दक्षता घेण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असुन त्याचा संगणक सांकेतांक **२०११०९०८१५३३१५००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**सही/-**
**(वि.मा.बिवलकर)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे
सर्व संचालक / सहसंचालक, कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे-१
विभागीय आयुक्त (पुणे, औरंगाबाद )
जिल्हाधिकारी, ( अहमदनगर, सातारा, सांगली, औरंगाबाद, जालना, बीड व नांदेड)
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,(अहमदनगर,सातारा,सांगली,औरंगाबाद,जालना,बीड व नांदेड)
विभागीय कृषि सहसंचालक (पुणे, कोल्हापूर, औरंगाबाद, लातूर)
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी ( अहमदनगर, सातारा, सांगली, औरंगाबाद, जालना, बीड व नांदेड)
कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद ( अहमदनगर, सातारा, सांगली, औरंगाबाद, जालना, बीड व नांदेड)
जिल्हा कोषागार अधिकारी ( अहमदनगर, सातारा, सांगली, औरंगाबाद, जालना, बीड व नांदेड)
मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, (अहमदनगर, सातारा, सांगली, औरंगाबाद, जालना, बीड व नांदेड)
व्यवस्थापकीय संचालक, कृषि उद्योग विकास महामंडळ मर्यादित, आरे दुग्ध कॉलनी गोरेगाव (पूर्व), मुंबई-६५
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, शास्त्रीनगर, अकोला.
सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ /२, मुंबई / नागपूर
महालेखाकार( स्थानीय निकाय लेखापरिक्षा व लेखा), प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०० ०२०
नियोजन विभाग (कार्यासन - १४३१ / कार्यासन - १४४४), मंत्रालय, मुंबई - ३२
वित्त विभाग व्यय -१/ अर्थसंकल्प -१३
सामाजिक न्याय, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग / आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई
सर्व सह सचिव / उपसचिव / अवर सचिव, कृषि व पदुम विभाग (कृषि व फलोत्पादन प्रभाग)
मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (कृषि ) यांचे खाजगी सचिव ,
निवड नस्ती